**अनैतिक व्यापारातून सुटका केलेल्या पीडित महिला / मुलींना त्यांचे मायदेशी रवाना करताना एस्कॉर्ट ड्युटी करणाऱ्या पोलीस कर्मचाऱ्यांना देण्यात येणा-या अतिरीक्त दैनिक भत्त्यात वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२३९/का-०३**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १६ नोव्हेंबर, २०१६.

वाचा :-

१) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक संकीर्ण-२०११/प्र.क्र.१६५/का-३, दिनांक २७.०५.२०११
२) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक संकीर्ण-२०११/प्र.क्र.१६५/का-३, दिनांक ३०.०४.२०१४

**प्रस्तावना:**

उपरोक्त वाचा येथील नमूद शासन निर्णयानुसार निरीक्षणगृहे / बालगृहे, संरक्षणगृहातील महिला व विशेष बालगृहातील मुला-मुलींना, महिलांना स्वग्रामी पोहोचविण्यासाठी त्यांच्यासोबत प्रवास करणाऱ्या पोलीस कर्मचाऱ्यांना रू. १५०/- (त्याच जिल्ह्यात) व रू. ३००/- (जिल्हा / राज्याबाहेर) या दराने अतिरिक्त दैनिक भत्ता अनुज्ञेय होता . तथापि, सद्यस्थितीत महागाईचे वाढलेले दर लक्षात घेता अनैतिक व्यापारातून सुटका केलेल्या पीडीत महिला / मुलींना मायदेशी / स्वगृही पाठविण्यासाठी त्यांच्यासोबत प्रवास करणाऱ्या पोलिस कर्मचाऱ्यास पीडीतांच्या खर्चासाठी जिल्ह्यांतर्गत प्रवासासाठी रू. १५०/- वरून रू. ३००/- आणि जिल्ह्याबाहेरील प्रवासासाठी रू. ३००/- ऐवजी रू.४५०/- अशी अतिरिक्त दैनिक भत्त्याच्या दरात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

या शासन निर्णयाद्वारे अनैतिक व्यापारातून सुटका केलेल्या पीडीत महिला / मुलींना, मायदेशी / स्वगृही पाठविण्यासाठी त्यांच्यासोबत प्रवास करणाऱ्या पोलिस कर्मचाऱ्यांना पीडीतांच्या खर्चासाठी जिल्ह्यांतर्गत प्रवासासाठी रू. ३००/- आणि जिल्ह्याबाहेरील प्रवासासाठी रू.४५०/- (प्रतिदिन /प्रति मुले/मुली/महिला) असा सुधारित अतिरिक्त दैनिक भत्ता म्हणून देय राहील. ही रक्कम त्यांनी त्यांचेसोबत असलेल्या महिला / मुलांकरीता खर्च करावयाची आहे.

२. या प्रयोजनासाठीचा खर्च प्रत्येक वित्तीय वर्षी २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, १०३ महिला कल्याण (०१) सामाजिक आधार, (०१) (०१) स्वागत केंद्रे, राज्यगृहे व संरक्षणगृहे (२२३५-१२५४) (५०) इतर खर्च या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध होणा-या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७७/१६/सेवा-५, दिनांक ०६.०६.२०१६ आणि अनौपचारिक संदर्भ क्र. ४९९/व्यय-६, दिनांक ३१.०८.२०१६ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६१११६११०३२१८६३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2016.11.16 17:13:46 +05'30'

**( स्मिता निवतकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
२. उप पोलीस महानिरिक्षक (पी.ए.डब्ल्यू.) पोलीस महासंचालक व महानिरिक्षक यांचे कार्यालय, मुंबई.
३. पोलीस आयुक्त (गुन्हे), गुन्हे अन्वेषण विभाग, मुंबई.
४. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे.
५. सर्व अध्यक्ष / सदस्य, बाल कल्याण समिती.
६. सर्व अध्यक्ष / सदस्य, बाल न्याय मंडळ.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग (सेवा-५), मंत्रालय, मुंबई.
१०.गृह विभाग (पोल-८), मंत्रालय, मुंबई.
११.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
१२.सर्व संस्थाचालक, निरिक्षणगृह / बालगृह, संरक्षणगृह / विशेष बालगृह.
१३.सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवड नस्ती / का-३.